राज्यातील शासनमान्य प्राथमिक शाळेत शिक्षण घेणाऱ्या अल्पसंख्याक समाजातील विद्यार्थ्यांकरिता कार्यान्वित करण्यात आलेल्या मोफत गणवेष वाटप योजनेंतर्गत अनुदान वितरीत करण्याबाबत.

**सन २०१०-११.**

**महाराष्ट्र शासन**
अल्पसंख्यांक विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक :अविवि -२०१०/प्र.क्र.९७/का.७
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
**दिनांक :- ३० मार्च, २०११**

संदर्भ :- शासन निर्णय, अल्पसंख्यांक विकास विभाग, क्रमांक - अविवि-२०१०/ प्र.क्र. ९७/०९/का-७, दि. २८ मार्च, २०११.

**शासन निर्णय :-**

संदर्भाधिन शासन निर्णयान्वये राज्यातील शासनमान्य प्राथमिक शाळेतील इयत्ता १ ली ते ४ थी मध्ये शिकत असलेल्या अल्पसंख्याक समाजातील (मुस्लिम, बौध्द, शीख, ख्रिश्चन, जैन व पारशी) विद्यार्थ्यांना गणवेष वाटपाबाबतची योजना कार्यान्वित करण्यात आली आहे. या योजनेच्या अंमलबजावणीसाठी सन २०१०-११ या आर्थिक वर्षासाठी रु.१६,२०,००,०००/- (रुपये सोळा कोटी, वीस लाख फक्त) एवढी रक्कम शिक्षण संचालक (अल्पसंख्याक व प्रौढ शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या स्वाधीन करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पहातील.

शिक्षण संचालक (अल्पसंख्याक व प्रौढ शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना सन २०१०-११ या आर्थिक वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या एकूण रु.१६,२०,००,०००/- (रुपये सोळा कोटी, वीस लाख फक्त) एवढ्या निधीच्या मर्यादेत अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून या रकमेचे आहरण व संवितरण करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

प्राथमिक शाळेतील अल्पसंख्यांक समाजातील विद्यार्थ्यांना शासनाच्या सध्या अस्तित्वात असलेल्या इतर योजनेनुसार गणवेष वाटप होत असल्यास अशा विद्यार्थ्यांस दुहेरी गणवेष वाटप होणार नाही याची जबाबदारी शिक्षण संचालक (अल्पसंख्याक व प्रौढ शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेवर राहील.

या योजनेंतर्गत होणारा खर्च "मागणी क्र.झेड ई-१, मुख्यलेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०३) प्राथमिक शाळांतील विद्यार्थ्यांकरिता गणवेषासाठी सहायक अनुदान (२२३५-ए-१०४) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या खाली सन २०१०-११ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या दि. ४ मार्च, २०११ च्या परिपत्रकान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर (www.mdd. maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात आला असून त्याचा **संगणक संकेतांक २०११०३३०१६२६१६००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( व्यंकटेश भट )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य,
सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई,
*प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई ,
प्रधान सचिव, संसदीय कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई, त्यांना विनंती आहे की, मा.विधानसभा / विधानपरिषद सदस्यांना कृपया या शासन निर्णयाची प्रत वितरीत करावी,
शिक्षण संचालक (अल्पसंख्याक व प्रौढ ), महाराष्ट्र राज्य, पुणे,
सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, प्रशासकीय इमारत ,मंत्रालयासमोर, मुंबई
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई,
संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे-३०,
अध्यक्ष/सचिव, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे-५,
राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र राज्य प्राथमिक शिक्षण परिषद, जवाहर बालभवन, मुंबई,
सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक,
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा) मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर,
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा) नागपूर,
संचालक, लेखा व कोषागरे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
अधिदोन व लेखा अधिकारी , मुंबई,
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई ,
सर्व जिल्हा कोषाधिकारी,
मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषदा सर्व
वित्त विभाग (व्यय -४) (अर्थसंकल्प) (वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
निवड नस्ती.

* पत्राद्वारे.